उप संचालक (माहिती), गट-अ (वरिष्ठ) या पदावरील तदर्थ पदोन्नतीस मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मावज-२०२१/१४६/प्र.क्र.२५/३४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- २४ मार्च, २०२३.

**संदर्भ :-** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.मावज-२०२१/१४६/प्र.क्र. २५ /३४-अ, दिनांक ७ सप्टेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

श्री. पु.द. पाटोदकर, वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) / जिल्हा माहिती अधिकारी / वरिष्ठ उपसंपादक / जनसंपर्क अधिकारी, गट अ (कनिष्ठ) यांना या विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ७ सप्टेंबर, २०२१ च्या शासन निर्णयान्वये उप संचालक (माहिती) गट-अ (वरिष्ठ) (वेतन श्रेणी एस-२३ : ६७७००-२०८७००) या पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली आहे. सदर तदर्थ पदोन्नती ही ११ महिने किंवा प्रतिनियुक्तीवरील उमेदवार विभागामध्ये परत येतील किंवा सरळसेवेने उमेदवार प्राप्त होतील यापैकी जे आधी घडेल त्या कालावधीसाठी देण्यात आली. श्री. पु.द. पाटोदकर, यांना देण्यात आलेल्या तदर्थ पदोन्नतीचा कालावधी दिनांक ६ ऑगस्ट, २०२२ (म.नं.) रोजी संपुष्टात आला असल्याने त्यांच्या तदर्थ पदोन्नतीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्री. पु.द. पाटोदकर, यांना प्रशासकीय कारणास्तव दिनांक ७ ऑगस्ट, २०२२ (म.पू.) रोजी उप संचालक (माहिती) गट-अ (वरिष्ठ) या पदावरुन वरिष्ठ सहायक संचालक (माहिती), मुंबई पदावर पदावनत करण्यात येऊन त्यांना दिनांक ७ ऑगस्ट, २०२२ रोजी एक दिवसाचा तांत्रिक खंड देण्यात येऊन तद्नंतर त्यांना दिनांक ८ ऑगस्ट, २०२२ (म.पू.) ते दिनांक ७ जुलै, २०२३ (म.नं.) या अकरा महिन्याच्या कालावधी करीता वरिष्ठ सहायक संचालक (माहिती), मुंबई या पदावरुन उपसंचालक (माहिती) गट-अ (वरिष्ठ) (वेतन श्रेणी एस-२३ : ६७७००-२०८७००) या पदावर तदर्थ पदोन्नतीस खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | उप संचालक (माहिती) गट-अ (वरिष्ठ) या पदावरील तदर्थ पदोन्नतीचा दिनांक | तदर्थ पदोन्नती संपुष्टात आल्याचा दिनांक | तांत्रिक खंडाचा दिनांक | उप संचालक (माहिती) गट-अ या पदावरील तदर्थ पदोन्नती पुढे चालू ठेवण्याचा कालावधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ३ | ४ | |
| १ | डॉ. पु.द. पाटोदकर | ७ सप्टेंबर, २०२१ | ६ ऑगस्ट, २०२२ | ७ ऑगस्ट, २०२२ | दि. ८ ऑगस्ट, २०२२ ते दि. ७ जुलै, २०२३ |

२. सदर अधिकाऱ्यांस उप संचालक (माहिती) या पदावरील तदर्थ पदोन्नतीस खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.-

**अटी व शर्ती :-**

१) गोपनीय अभिलेखाच्या आधारे सदर अधिकाऱ्यांचे अधिक्रमण प्रस्ताविलेले नाही. सदर अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशी प्रस्तावित अथवा प्रलंबित नाही.

२) शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ मधील विहित केलेल्या पदोन्नतीच्या सर्व निकषांची पूर्तता केलेली असून त्या आधारे उमेदवाराची पात्रता तपासण्यात आली आहे.

३) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी उप संचालक (माहिती), संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्यांला पदावनत करण्याच्या अधीन सदर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहेत.

४) सदरची तदर्थ पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरुपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे.

५) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

६) सदर तदर्थ पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ व विशेष अनुमती याचिका क्र. २५१८१/२०१८ व त्यातील आय.ए. क्र. २५९०/२०१९ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

७) सदर तदर्थ पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील प्रलंबित असलेल्या रिट पिटिशन (स्टॅम्प) क्र.१०८७६/२०२१ व रिट पिटिशन (स्टॅम्प) क्र. १०८७८/२०२१ यामधील आय.ए. (स्टॅम्प) क्र. १०९१०/२०२१ व १०९११/२०२१ तसेच रिट पिटिशन (स्टॅम्प) क्र.१०९०९/२०२१ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

८) प्रतिनियुक्तीने रिक्त झालेल्या पदावर देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती ही ११ महिने किंवा प्रतिनियुक्तीवरील उमेदवार विभागामध्ये परत येतील किंवा सरळसेवेने उमेदवार प्राप्त होतील यापैकी जे आधी घडेल तो पर्यंत राहिल. दरम्यानच्या काळात प्रतिनियुक्तीवरील उमेदवार परत आल्यास तदर्थ पदोन्नती झालेल्या कनिष्टतम अधिकाऱ्यांस पदावनत करण्यात येईल. सदर तदर्थ पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधित अधिकाऱ्याचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३२४१३०२३१३९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPALI PATHAK

Digitally signed by DEEPALI PATHAK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=245ec1be5f40ed10b626817ad30a304c166dfdaf8cfc319c79bbe3e5015ee80d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=33F1FFF243134SC1855F0CF55F805FE47971290598 1CC867AA66332A9FB5C6D5, cn=DEEPALI PATHAK
Date: 2023.03.24 13:06:54 +05'30'

**( दीपाली पाठक )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
२. प्रधान सचिव (मा. व ज. ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर (२ प्रती),
५. संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
६. संचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, नागपूर,
७. संचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, औरंगाबाद,
८. सर्व उप संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,
९. उप संचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. आहरण व संवितरण अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१२. संबंधित अधिकारी (मा. व ज. मार्फत),
१३. निवडनस्ती (का.३४-अ).